संकेतांक क्र.२०१००८१०१७००२८००१

**अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून ऊर्जा निर्मितीचे नवीन धोरण २००८ मध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग उर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. अपाऊ-२००९/प्र.क्र. १५२८/ऊर्जा ७**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक :- ०३ ऑगस्ट,२००९**

वाचा:- शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
क्रमांक : अपाऊ-२००७/प्र.क्र.६१३/ऊर्जा-७,
दिनांक - १४.१०.२००८

**शासन निर्णय :**

अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतास प्रोत्साहन देण्यासाठी राज्य शासनाने अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून ऊर्जा निर्मितीचे नवीन धोरण उपरोक्त संदर्भांकित दिनांक १४.१०.२००८ च्या शासन निर्णयान्वये जाहीर केले आहे. सदर शासन निर्णयामधील निष्कासन व्यवस्थेचा खर्च, वीज निर्मिती प्रकल्प व भांडवली अनुदानासंदर्भातील संदिग्धता दूर करुन खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

| दिनांक १४.१०२००८ च्या शासन निर्णयातील तरतूदी | सुधारणा |
|---|---|
| १) कलम १.१- या धोरणांतर्गत देय असलेल्या सोयी सवलती प्रकल्पाच्या प्रवर्तकांना/ विकासकांना/ गुंतवणूकदारांना प्राप्त करावयाच्या असतील तर या धोरणांतर्गत कार्यान्वित होणाऱ्या प्रकल्पातील निर्मित वीजेपैकी ५० टक्के वीज दीर्घ मुदतीच्या कराराने महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने निश्चित केलेल्या दराने विकणे बंधनकारक राहील. उर्वरित ५० टक्के वीज महाराष्ट्रात विकणे बंधनकारक राहील. | १) अपारंपारिक ऊर्जा स्त्रोताव्दारे निर्माण होणारी १०० टक्के वीज राज्यातील कोणत्याही अनुज्ञप्तीधारकास किंवा ग्राहकास विक्री करणे बंधनकारक राहील. तसेच जलसंपदा विभागांतर्गत २५ मे.वॅट पर्यंतच्या प्रकल्पातून निर्माण होणारी १०० टक्के वीज राज्यातील कोणत्याही अनुज्ञप्तीधारकास किंवा ग्राहकास विकण्यास मुभा राहील. |

| | |
|---|---|
| २) कलम-४- ऊसाच्या चिपाडावर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्प/ वीज निर्मिती प्रकल्प- | २) ऊसाच्या चिपाडासहित कृषी अवशेषांपासून सहवीज निर्मिती करणाऱ्या प्रकल्पांनादेखील कलम-४ अंतर्गत शासनाकडून लागू करण्यात आलेल्या सर्व सोयी सवलती देय राहतील. |
| ३) कलम ४.०३- हरित ऊर्जा निधीमधून सहवीज निर्मिती/ वीजनिर्मिती प्रकल्पाच्या उच्चदाब/अति उच्चदाब केंद्रांसाठी प्रति प्रकल्प रु. १ कोटी भांडवली अनुदान देण्यात येईल. | ३) प्रकल्पाच्या उच्चदाब/अति उच्चदाब उपकेंद्रांसाठी द्यावयाच्या प्रति प्रकल्प रु. १ कोटी भांडवली अनुदानासाठी सदर उच्चदाब/ अतिउच्चदाब उपकेंद्र महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी/ महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीकडून प्रमाणित करुन घेणे आवश्यक आहे. |

या धोरणांतर्गत देय असलेल्या सोयी व सवलती प्रकल्पाच्या प्रवर्तकांना/ विकासकांना/ गुंतवणूकदारांना प्राप्त करुन घ्यावयाच्या नसतील तर त्यांना प्रकल्पासाठी शासनाकडून मूलभूत सुविधा संमती पत्र घ्यावे लागणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

स्मि.श.रानडे

( स्मि.श.रानडे)
शासनाच्या उप सचिव

प्रति,

- सचिव, मुख्यमंत्र्याचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
- मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मंबई- ४०० ०३२
- अपर मुख्य सचिव , सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- . प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
- प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
- प्रधान सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान सचिव (नगर विकास-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

- प्रधान सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान सचिव, पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- सचिव (उद्योग), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- सचिव,महाराष्ट्र नियामक आयोग, मुंबई( पत्राने )
- व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सुत्रधार कंपनी मर्या., मुंबई.
- व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, वितरण कंपनी मर्या., मुंबई.
- व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, निर्मिती कंपनी मर्या., मुंबई.
- व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, पारेषण कंपनी मर्या., मुंबई.
- महासंचालक,महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण ,पुणे
- खाजगी सचिव, मा.मंत्री, (ऊर्जा)
- खाजगी सचिव, मा.मंत्री, अपारंपरिक ऊर्जा
- खाजगी सचिव, सर्व मा. मंत्री व सर्व मा. राज्यमंत्री
- सर्व परवानाधारक कंपन्या
- सर्व मंत्रालयीन विभाग
- ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.
- निवडनस्ती

----------